प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) अंतर्गत राज्य शासनाच्या हिश्याचा (अनुसूचित जाती उपयोजना) (विघयो) या घटकांतर्गतचा निधी सन २०२१-२२ या वर्षात वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक: प्रआयो-२०२१/प्र.क्र.४४/योजना-१०
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड,
फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : ३१ डिसेंबर, २०२१

<u>वाचा :-</u>

१) उप सचिव (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/०१/२०१९-RH (A/C)-१/A-Maharashtra, दि.२४.०८.२०२० रोजीचे आदेश.

२) सह संचालक (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/०१/२०१९-RH (A/C)-२/A-Maharashtra, दि.२८.१२.२०२० रोजीचे आदेश.

३) सह संचालक (ग्रामीण गृहनिर्माण), ग्रामीण विकास मंत्रालय भारत सरकार, नवी दिल्ली यांचे क्र. J-१२०२५/०१/२०१९-RH (A/C)-Maharashtra, दि.३०.१२.२०२० रोजीचे आदेश.

४) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण गृहनिर्माण यांचे पत्र क्र. राव्यकृ-ग्रागृ/लेखा(प्रआयो)/ अनु.जाती./२०२१/६७, दि.१२.०४.२०२१.

५) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय मुंबई, शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२०/प्र.क्र.२५/अर्थसंकल्प (विघयो), दि. ०९.१२.२०२१.

**शासन निर्णय:-**

प्रधानमंत्री आवास योजना ग्रामीण अनुसूचित जाती घटकांतर्गत केंद्र शासनाने सन २०१९-२० या वर्षामध्ये महाराष्ट्र राज्यास मंजूर केलेल्या निधीचा समरूप राज्य हिस्सा रू. ४६,००,१३,८००/- (अक्षरी रूपये सेहेचाळीस कोटी तेरा हजार आठशे फक्त) (अनुसूचित जाती उपयोजना) एवढा निधी खर्च करण्यास व अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०२१-२२ या वर्षातील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा, व मागणी क्र. एन-३, २५०५ ग्रामीण रोजगार, ६० इतर कार्यक्रम, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेषघटक योजना (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना (०१)(०५) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२५०५ ए१११) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती कार्यासन योजना-२ यांना सादर करण्यात यावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३)

रक्कम काढल्याचा देयक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयात नोंद झालेल्या रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

४. प्रस्तुत निधीबाबत उपसंचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण-गृहनिर्माण हे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून (संकेतांक क्रमांक १२०१००५१८३) तसेच संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष ग्रामीण - गृहनिर्माण हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. सदर निधीचे देयके ठाणे कोषागार अंतर्गत उपकोषागार कार्यालय, कोकण भवन, बेलापूर येथे पारित करण्यात यावेत.

५. सदर अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आलेले आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. १३२/अर्थसंकल्प,दि.७.१२.२०२१ तसेच, वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ९८५/व्यय-१४, दि.१३.१०.२०२१ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२३११११०८५१०६२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun Vasant Shinde

Digitally signed by Arun Vasant Shinde
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Industries Energy & Labour Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=213d983c0c3b73519fa14c37396dd0b3cf8f28e16bc2fb6620a5c4fdac6e7284, serialNumber=672d36cc7468aa812e66dbb4704ffeb120dd58831284824f4fbec2a6f6602199, cn=Arun Vasant Shinde
Date: 2021.12.31 12:17:03 +05'30'

**(अरुण व. शिंदे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई (पाच जादा प्रतींसह)
२) संचालक, राज्य व्यवस्थापन कक्ष-ग्रामीण गृहनिर्माण, सिडको भवन, बेलापूर, नवी मुंबई.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
४) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन बेलापूर
५) सामाजिक न्याय विभाग व विशेष सहाय (वि.घ.योजना), मंत्रालय, मुंबई -३२.

६) वित्त विभाग (व्यय-१५) व (अर्थ-१७) मंत्रालय मंबई-३२.

७) कार्यासन अधिकारी, वित्त-७, वित्त-१, योजना-१, योजना-२, योजना-५ व योजना-७, व निवड नस्ती योजना-१० ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मुंबई.